**आरोग्य सेवा आयुक्तालयाच्या आस्थापनेवरील आरोग्य वैद्यकीय अधिका-यांची ५४५ अधिसंख्य पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः अपदे-२०२२/प्र.क्र. ७१/आरोग्य-३**
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : १२ एप्रिल, २०२२.

वाचा :

**१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः पदआ-२०२१/प्र.क्र.१२०/आरोग्य-३, दिनांक ०६.०९.२०२१.**
**२) आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे पत्र क्रमांकः आसेआ/पी.जी.सेल/अधिसंख्य पदे पुढे चालू ठेवणे /१३३/२०२२, दिनांक ११.०३.२०२२.**

**शासन निर्णय :**

उपरोक्त संदर्भाधीन अनुक्रमांक-१ येथील शासन निर्णयान्वये आरोग्य सेवा संचालनालयाच्या आस्थापनेवरील ५४५ वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या अधिसंख्य पदांना दि.०१.०९.२०२१ ते दि.२८.०२.२०२२ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात आली होती. सदर मुदतवाढ संपुष्टात आली आहे.

२. आता या शासन निर्णयान्वये सदर ५४५ वैद्यकीय अधिका-यांची अधिसंख्य पदांना दि.०१.०३.२०२२ ते दि.३१.०८.२०२२ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर पदावरील खर्च खालील नमूद लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०२२-२३ या वर्षाकरीता मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा :-

मागणी क्रमांक - आर-१,
मुख्यलेखाशिर्ष "२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य,
(०१)(०४) - गट वैद्यकीय अधिकारी (२२१० ०३७१) (०१) वेतन"

४. हा निर्णय,शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/आपुक,दि.२२.०२.२०२२ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४१११७५४२४५६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=685cbbb5899027ea29d44ae02d12f2c1313143ad8376755d0e815a1eb20fd0ce, cn=Roshani Dinesh Kadam Patil
Date: 2022.04.12 12:09:21 +05'30'

**(रो.दि.कदम-पाटील)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल १/ २ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. सह संचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई.
५. सर्व उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ.
६. सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी.
७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
८. वित्त विभाग (कार्यासन- व्यय-१३/ अर्थसंकल्प-१९), मंत्रालय, मुंबई.
९. सार्वजनिक आरोग्य विभाग (कार्यासन- सेवा-२/अर्थसंकल्प).
१०.निवडनस्ती (आरोग्य ३).